मुख्यमंत्री ग्रामसडक योजना
मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या ADB टप्पा २ अंतर्गत, सिंधुदूर्ग जिल्ह्यातील पुलांच्या कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२१/प्र.क्र.६१६/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख : २९ ऑक्टोबर, २०२१

वाचा :

१. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८.१०.२०१५
२. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०१५/प्र.क्र.८/पंरा-७, दिनांक ११.१२.२०१५
३. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१, दिनांक २५.१०.२०१८
४. **शासन पत्र, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२०/प्र.क्र.१८९/बांध-४, दिनांक २३.०४.२०२०
५. **मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), पुणे यांचे पत्र :** मु.अ./प्रमंग्रासयो/१६३९/२०२१, दिनांक २४.०९.२०२१.

**शासन निर्णय :**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या ADB टप्पा-२ अंतर्गत, सिंधुदूर्ग जिल्ह्यातील पुलांच्या कामांना, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या किंमतीस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | पुलांची लांबी (मी.) | कामाची किंमत (रू.लक्ष) | कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्तीची रक्कम (रू.लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | मालवण | SIN-ADB-BR-०१ | शिरवंडे दलीतवस्ती किर्लोस रस्त्यावरील पुल सा.क्र.४/४०० | १२०.०० | ८२८.२८ | १८.८९ |

| अ.क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | पुलांची लांबी (मी.) | कामाची किंमत (रू.लक्ष) | कामाची ५ वर्षे नियमित देखभाल व दुरुस्तीची रक्कम (रू.लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | देवगड | SIN-ADB-BR-०२ | तोरसोळेफाटा ते वळीवंडे बाबरवाडी रस्त्यावरील पुल सा.क्र.४/००० | ८.०० | ५४.२७ | १.६३ |
| ३ | कणकवली | | नडगिवे बेर्ले शेर्पे रस्त्यावरील पुल सा.क्र.०/३२५ | १०.०० | ८३.७८ | २.५१ |
| ४ | दोडामार्ग | SIN-ADB-BR-०३ | तळकट कुंभवडे चौकुळ रस्त्यावरील पुल सा.क्र.०/१५० | ४०.०० | २९३.१५ | ७.९१ |
| ५ | सावंतवाडी | | माजगाव चिपटेवाडी रस्त्यावरील पुल सा.क्र.३/६०० | ६.०० | ५३.८५ | १.६१ |
| **एकुण** | | | | **१८४.००** | **१३१३.३३** | **३२.५५** |

१. सदर कामे ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

२. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) व कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक ग्रासयो-२०१८/ प्र.क्र.२३९/बांधकाम-१, दि.२५.१०.२०१८ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार, प्रत्येक पुलांच्या कामांना तांत्रिक मान्यता द्यावी.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन परिपत्रक क्र.BDG-१०८०/८०८३८(३९४)/ Desk-२, दिनांक ०३ नोव्हेंबर, १९८० मधील सूचनांनुसार, ३० मी. पेक्षा जास्त लांबीच्या पुलांच्या बांधकामाचे General Arrangement Drawing (GAD) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संकल्पचित्र मंडळाकडून प्राप्त करून GAD वर आधारित अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात यावी.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था व मुख्य अभियंता तसेच अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी पुलांचे बांधकाम करण्यासाठी ई-टेंडरिंग करूनच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

५. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजुरी देण्यापुर्वी व काम सुरू करण्यापुर्वी पुढील बाबींची पुर्तता करण्यात यावी.

i) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापुर्वी पुलाच्या कामाचा वाव, Pavement Design व Hydraulic Calculations पुन:श्च काटेकोरपणे तपासण्यात येऊन, त्याप्रमाणे संकल्पन निश्चित करण्यात यावे.

ii) आवश्यकतेनुसार ३० मी. पेक्षा जास्त लांबीच्या पुलांचे संकल्पनास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संकल्प चित्र मंडळ (पुल) यांच्या मान्यतेनंतर सदर पुलाच्या कामास तांत्रिक मान्यता देण्यात यावी.

iii) सदर पुलांच्या कामासाठी लागणारी जमीन या विभागाच्या ताब्यात आहे, याची खातरजमा करून घ्यावी. खाजगी जमीन अथवा वन विभागाची ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक असलेल्या पुलांची कामे हाती घेण्यात येऊ नयेत, याबाबत पुन:श्च खात्री करण्यात यावी.

iv) तांत्रिक मान्यता देणाऱ्या प्राधिकाऱ्याने हे काम कोणत्याही पाटबंधारे/जल विद्युत पाणीपुरवठा प्रकल्पाच्या जलाशयाखाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पांमुळे या कामावर कोणताही परिणाम होणार नाही याची खात्री करावी.

v) अंदाजपत्रकामध्ये कामाची मराठीमधुन माहिती दर्शविणाऱ्या फलकाची तरतुद केलेली असावी.

vi) प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन/दर/दर पृथ:करण/रक्कम/दर पृथ:करणातील गृहित धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी, तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे. या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

vii) तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कामामध्ये प्रस्तावित वाव अन्य कोणत्याही योजनेत/कार्यक्रमात समाविष्ठ नाही तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, महानगरपालिका, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ इत्यादी तत्सम यंत्रणेकडे मंजुर नाही, याची खातरजमा करावी.

viii) सदर कामांना सन २०२०-२१ च्या अद्ययावत दरसुचीनुसार तांत्रिक मंजुरी देण्यात यावी.

ix) सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

०२. सदर कामावरील खर्च “मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००) (०१) , मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी-५०५४ ५१५३” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२९११३७०८०३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2021.10.29 12:27:20 +05'30'

**(प्रविण जैन)**

**वित्तीय नियंत्रक तथा उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ,मुंबई.
२) मा.अ.मु.स.(ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
३) मा.सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
४) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय, मुंबई-३२.
५) जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण विभाग.
८) मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
९) अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), कोकण विभाग, ठाणे.
१०) वित्तीय नियंत्रक, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, बांधकाम भवन, मुंबई.
११) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सिंधुदूर्ग.
१२) कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सिंधुदूर्ग.
१३) कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग.
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग.
१५) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१६) निवड नस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.